सहकार पणन व वस्त्रोद्योग विभागातील विभागातील अपर निबंधक, सहकारी संस्था, गट-अ/ सहनिबंधक सहकारी संस्था गट-अ/ उपनिबंधक सहकारी संस्था गट-अ / सहायक निबंधक सहकारी संस्था गट-ब या संवर्गांचे संवर्गनिहाय संख्याबळ (Cadre Strength) निश्चित करणेबाबत....

**महाराष्ट्र शासन**

**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः राजस-२०२२/प्र.क्र.१९/५-स**

मादाम कामा मार्ग,हुतात्मा राजगुरू चौक, मंत्रालय, मुंबई - ३२.

दिनांक: ३ मार्च, २०२२.

**वाचा:-**

१) शासन निर्णय ,सामान्य प्रशासन विभाग, क्र. एसआरव्ही-२०११/प्र.क्र.१३७/ कार्यासन-१२, दि. १७/१२/२०१६

२) शासन निर्णय ,सामान्य प्रशासन विभाग, क्र. एसआरव्ही-२०१६/प्र.क्र.५१०/ कार्यासन-१२, दि. १६/०२/२०१८

**प्रस्तावना :-**

शासनाच्या विविध कार्यालयांमध्ये तसेच महामंडळामध्ये निव्वळ महाराष्ट्र सहकारी संस्था अधिनियम १९६० व महाराष्ट्र कृषी पणन उत्पन्न (विकास व विनियमन) अधिनियम १९६३ या कायद्यांचे ज्ञान असलेल्या अधिकाऱ्यांची आवश्यकता आहे. यास्तव, सदर पदे ही सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभागातील अधिकाऱ्यांमधून भरण्यात येतात. विभागातील प्रतिनियुक्तीची पदे ही मूळत: विभागाच्या कामकाजाशी संबंधित व विभागाच्या अखत्यारीतील संस्थांमधील आहेत.सदर पदे त्यांच्या मूळ संवर्गातून भरण्यात येतात. त्याबाबत वेळोवेळी शासन निर्णय निर्गमीत केले आहेत.तसेच काही संस्थांच्या उपविधीमध्ये त्याबाबत तरतूद आहे.सदर पदावर नियुक्ती , पदोन्नती ,बदली करताना नियमीत पदांप्रमाणेच कार्यवाही करण्यात येते.

सबब अशा कार्यालय/महामंडळावर केवळ सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभागातील अधिकारी/कर्मचारी यांचीच प्रतिनियुक्तीने नियुक्ती करण्यात येते. सामान्य प्रशासन विभागाच्या संदर्भाधीन शासन निर्णयातील प्रतिनियुक्तीच्या धोरणाच्या अनुषंगाने निर्गमित केलेल्या तरतुदीमधील परि. ५ (अ) (६) मधील तरतुदीनुसार विशिष्ट संवर्गातील अधिकारी/कर्मचारी यांच्या सेवा प्रतिनियुक्तीने घेणे आवश्यक असल्यास, जर अशी पदे अन्य प्रशासकीय विभागाच्या आस्थापनेवर निर्माण केलेली असतील (ज्या पदाचे वेतन राज्य शासनाच्या एकत्रित निधितुन दिले जात असेल अशा प्रकरणी) किंवा अशी पदे राज्य शासनाच्या नियंत्रणाखालील मंडळे, महामंडळे, कंपन्या, सार्वजनिक उपक्रम तसेच स्वायत्त संस्था यांच्या आस्थापनेवर निर्माण केलेले असतील (ज्या पदांचे वेतन राज्य शासनाच्या एकत्रित निधितून दिले जात नाही) तर अशा पदांना प्रतिनियुक्ती धोरण लागू

होणार नाही. बदली अधिनियमातील तरतुदीनुसार अशा पदांवर नियुक्ती देण्याची कार्यवाही संबंधीत संवर्ग नियंत्रण विभागामार्फत करण्यात यावी, अशी तरतुद करण्यात आलेली आहे.

सामान्य प्रशासन विभागाच्या उपरोक्त धोरणानुसार ज्या शासकीय कार्यालयातील/महामंडळातील पदे केवळ सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभागातील अधिकाऱ्यांमधूनच प्रतिनियुक्तीने भरली जातात, अशी पदे सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभागाच्या आस्थापनेवर एकत्रित दर्शविणे आवश्यक आहे. त्यानुसार सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभागातील संबंधीत संवर्गाची आकृतिबंधानुसार मंजूर पदसंख्या व ज्या शासकीय कार्यालयातील/महामंडळातील पदे केवळ सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभागातील अधिकाऱ्यांमधून प्रतिनियुक्तीने भरली जातात, अशी त्या त्या संवर्गातील प्रतिनियुक्तीवरील पदे मिळून संबंधीत संवर्गांचे एकून संख्याबळ (Cadre Strenth) निश्चित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय :-</u>**

उपरोक्त प्रस्तावना विचारात घेता, सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभागातील अपर निबंधक, सहकारी संस्था, गट-अ/ सहनिबंधक सहकारी संस्था गट-अ/ उपनिबंधक सहकारी संस्था गट-अ / सहायक निबंधक सहकारी संस्था गट-ब असे एकूण ४ संवर्गाचे संवर्गनिहाय एकूण संख्याबळ खालीलप्रमाणे निश्चित करण्यास या शासन निर्णयाव्दारे मान्यता देण्यात येत आहे-

| **अ.क्र.** | **पदनाम** | **वेतनश्रेणी** | **आकृतिबंधानुसार मंजूर संवर्ग पदसंख्या** | **ज्या कार्यालय/ महामंडळामध्ये केवळ सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभागातील अधिकारी/ कर्मच्याऱ्यांची प्रतिनियुक्तीने नियुक्ती केली जाते अशा पदांची संख्या (परिशिष्ट- अ,ब,क व ड प्रमाणे)** | **एकूण संवर्ग संख्याबळ** |
|---|---|---|---|---|---|
| **१** | **२** | **३** | **४** | **५** | **६** |
| १ | अपर निबंधक, सहकारी संस्था | S-२७ : ११८५००-२१४१०० | ५ | १३ | १८ |
| २ | सहनिबंधक सहकारी संस्था | S-२३ : ६७७००-२०८७०० | २८ | ४ | ३२ |
| ३ | उपनिबंधक सहकारी संस्था | S-२० : ५६१००-१७७५०० | १३३ | १५ | १४८ |
| ४ | सहायक निबंधक सहकारी संस्था | S-१५ : ४१८००-१३२३०० | ४५१ | ८ | ४५९ |

२. उपरोक्त तक्त्यात नमुद केलेले संवर्गनिहाय एकूण संख्याबळ हे खालील प्रयोजनासाठी विचारात घेण्यात येईल-

१) संबंधीत संवर्गाच्या सेवाप्रवेश नियमात नमुद केलेले नियुक्तीचे प्रमाण हे एकूण संवर्ग संख्याबळास लावण्यात येईल व त्याप्रमाणे सरळसेवा व पदोन्नतीची कार्यवाही करण्यात येईल.

२) उपरोक्त तक्त्यातील रकाना क्र. ५ मधील प्रतिनियुक्तीच्या पदावर नियुक्ती ही बदली अधिनियमानुसार बदलीने करण्यात येईल.

३) उपरोक्त तक्त्यातील रकाना क्र. ६ मधील संख्याबळाचा वेळोवेळी आढावा घेऊन रकाना क्र. ४ व ५ मधील पदसंख्येमध्ये जसे जसे बदल होतील, त्याप्रमाणे त्याबाबत शासन निर्णय निर्गमित करण्यात येईल.

३. केवळ सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभागातील अधिकारी प्रतिनियुक्तीने जात असलेल्या पदांचा सविस्तर तपशील सोबतच्या **परिशिष्ट-अ,ब,क,व ड** मध्ये दिला आहे.

४. प्रस्तुत शासन निर्णय सामान्य प्रशासन विभागाने त्यांच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक १९०/का-१२ दि.२५/२/२०२२ अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.inया संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात येत असून त्याचा संकेताक २०२२०३०३१३२२१७६२०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Pallavi Kishor Kolekar

Digitally signed by Pallavi Kishor Kolekar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Co-operation, Marketing and Textile Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=ba35d79c9fe547ea6b606f742ced2d6ebfd2c68412e49f5edac040ea7952ed5d, serialNumber=e01062e9c78c4616d627a8cf0a5b109edc1a71f9a6cd0f92b84ddfcfc6c858ac, cn=Pallavi Kishor Kolekar
Date: 2022.03.03 13:27:58 +05'30'

**सोबत:- परिशिष्ट- अ,ब,क,ड.**

**( पल्लवी कोळेकर )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. सहकार आयुक्त व निबंधक सहकारी संस्था महाराष्ट्र राज्य, पुणे.
२. मा. मंत्री (सहकार व पणन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. राज्यमंत्री (सहकार) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा. राज्यमंत्री (पणन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. मा.प्रधान सचिव (सहकार) यांचे स्विय सहाय्यक, सहकार व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. उपसचिव (आस्थापना), सहकार व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. उपसचिव (सा.प्र.वि.१२), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. निवडनस्ती/५-स.

**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग शासन निर्णय क्रमांक-राजस-२०२२/प्र.क्र.१९/५स, दि.०३ मार्च, २०२२ सोबतचे परिशिष्ट-अ**

| अ.क्र. | संवर्गाचे नाव व वेतनश्रेणी | प्रतिनियुक्तीवरील यंत्रणेचे नाव | प्रतिनियुक्तीवरील पदाचे नाव | एकूण पदांची संख्या |
|---|---|---|---|---|
| १ | अपर निबंधक सहकारी संस्था गट-अ एस-२७ (११८५००-२१४१००) | महाराष्ट्र राज्य सहकारी कृषि ग्रामीण विकास बहुउद्देशीय बँक, मुंबई | अपर निबंधक तथा अवसायक, महाराष्ट्र राज्य सहकारी कृषि ग्रामीण विकास बहुउद्देशीय बँक, मुंबई | १ |
| | | महाराष्ट्र राज्य सहकारी ग्राहक महासंघ मर्या. मुंबई | अपर निबंधक तथा व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी ग्राहक महासंघ मर्या. मुंबई | १ |
| | | मुंबई कृषि उत्पन्न बाजार समिती, मुंबई | अतिरिक्त सचिव, मुंबई कृषि उत्पन्न बाजार समिती, मुंबई | १ |
| | | महाराष्ट्र राज्य सहकारी निवडणूक प्राधिकरण, पुणे | अपर निबंधक तथा सचिव, महाराष्ट्र राज्य सहकारी निवडणूक प्राधिकरण, पुणे | १ |
| | | महाराष्ट्र राज्य कृषि पणन मंडळ, पुणे | अपर निबंधक तथा कार्यकारी संचालक, महाराष्ट्र राज्य कृषि पणन मंडळ, पुणे | १ |
| | | नागपूर कृषि उत्पन्न बाजार समिती, नागपूर | अपर निबंधक तथा सचिव, नागपूर कृषि उत्पन्न बाजार समिती, नागपूर | १ |
| | | मुख्य कार्यकारी संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी संघ मर्या. पुणे | अपर निबंधक तथा मुख्य कार्यकारी संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी संघ मर्या. पुणे | १ |
| | | महाराष्ट्र राज्य सहकारी बँक लि. मुंबई | अपर निबंधक तथा अधिकारी महाराष्ट्र राज्य सहकारी बँक लि. मुंबई | १ |
| | | मुंबई महानगर प्रदेश, लोखंड व पोलाद बाजार समिती, मुंबई | मुख्य कार्यकारी अधिकारी, मुंबई महानगर प्रदेश, लोखंड व पोलाद बाजार समिती, मुंबई | १ |

| अ.क्र. | संवर्गाचे नाव व वेतनश्रेणी | प्रतिनियुक्तीवरील यंत्रणेचे नाव | प्रतिनियुक्तीवरील पदाचे नाव | एकूण पदांची संख्या |
| --- | --- | --- | --- | --- |
| | | महाराष्ट्र राज्य वखार महामंडळ, पुणे | सहव्यवस्थापकीय संचालक व सचिव महाराष्ट्र राज्य वखार महामंडळ, पुणे | १ |
| | | मुंबई कृषि उत्पन्न बाजार समिती, मुंबई | सचिव, मुंबई कृषि उत्पन्न बाजार समिती, मुंबई | १ |
| | | महाराष्ट्र राज्य सहकारी विकास महामंडळ, पुणे | अपर निबंधक तथा सह व्यवस्थापकीय संचालक व सचिव, महाराष्ट्र राज्य सहकारी विकास महामंडळ, पुणे | १ |
| | | सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई | सहसचिव तथा अपर निबंधक सहकारी संस्था, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई. | १ |
| | | | एकूण | १३ |

**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग शासन निर्णय क्रमांक-राजस-२०२२/प्र.क्र.१९/५स, दि. ०३ मार्च, २०२२ सोबतचे परिशिष्ट-ब**

| अ.क्र. | संवर्गाचे नाव व वेतनश्रेणी | प्रतिनियुक्तीवरील यंत्रणेचे नाव | प्रतिनियुक्तीवरील पदाचे नाव | एकूण पदांची संख्या |
|---|---|---|---|---|
| १ | सहनिबंधक सहकारी संस्था, गट-अ<br>एस-२३<br>(६७७००- २०८७००) | झोपडपट्टी पुनर्वसन (पूर्व व पश्चिम उपनगरे) प्राधिकरण, मुंबई | सहनिबंधक, झोपडपट्टी पुनर्वसन (पूर्व व पश्चिम उपनगरे) प्राधिकरण, मुंबई | १ |
| | | महाराष्ट्र राज्य कृषि पणन मंडळ, पुणे | सहनिबंधक तथा सरव्यवस्थापक महाराष्ट्र राज्य कृषि पणन मंडळ, पुणे | १ |
| | | राज्य सहकारी निवडणूक प्राधिकरण, पुणे | सहनिबंधक तथा सहाय्यक सहकार निवडणूक अधिकारी, राज्य सहकारी निवडणूक प्राधिकरण, पुणे | १ |
| | | मुंबई कृषि उत्पन्न बाजार समिती, मुंबई | सहनिबंधक तथा सहसचिव,मुंबई कृषि उत्पन्न बाजार समिती, मुंबई | १ |
| | | | एकूण | ४ |

**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग शासन निर्णय क्रमांक-राजस-२०२२/प्र.क्र.१९/५स, दि. ०३ मार्च, २०२२ सोबतचे परिशिष्ट-क**

| अ.क्र. | संवर्गाचे नाव व वेतनश्रेणी | प्रतिनियुक्तीवरील यंत्रणेचे नाव, वेतनश्रेणी | पदाचे नाव व वेतनश्रेणी | एकूण पदांची संख्या |
|---|---|---|---|---|
| १ | उपनिबंधक सहकारी संस्था गट-अ एस-२० (५६१००-१७७५००) | बृहन्मुंबई नागरी सहकारी बँक्स असोसिएशन,मुंबई | उपनिबंधक,बृहन्मुंबई नागरी सहकारी बँक्स असोसिएशन, मुंबई | १ |
| | | म्हाडा, मुंबई | उपनिबंधक,सहकारी संस्था म्हाडा, मुंबई | २ |
| | | मुंबई कृषि उत्पन्न बा.समिती मुंबई | उपनिबंधक/उपसचिव, मुंबई कृषि उत्पन्न बा.समिती मुंबई | ३ |
| | | महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ मर्या. मुंबई | सरव्यवस्थापक, महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ मर्या. मुंबई | १ |
| | | महाराष्ट्र राज्य कृषि पणन मंडळ, पुणे | उपनिबंधक/उपसरव्यवस्थापक, म. रा.कृ.प.मंडळ , पुणे | ३ |
| | | पुणे जिल्हा नागरी सहकारी बँक्स असो. लि. पुणे | उपनिबंधक, पुणे जिल्हा नागरी सहकारी बँक्स असो. लि. पुणे | १ |
| | | राज्य सहकारी निवडणूक प्राधिकरण, पुणे | उपसहकार निवडणूक आयुक्त, राज्य सहकारी निवडणूक प्राधिकरण, पुणे | १ |
| | | महाराष्ट्र सहकार विकास महामंडळ मर्या. पुणे | महाव्यवस्थापक (प्रकल्प) महाराष्ट्र सहकार विकास महामंडळ मर्या. पुणे | २ |
| | | कोल्हापूर जिल्हा नागरी सहकारी बँक्स असो. लि. कोल्हापूर | उपनिबंधक, कोल्हापूर जिल्हा नागरी सहकारी बँक्स असो. लि. कोल्हापूर | १ |
| | | | एकूण | १५ |

**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग शासन निर्णय क्रमांक-राजस-२०२२/प्र.क्र.१९/५स,**
**दि. ०३ मार्च, २०२२ सोबतचे परिशिष्ट-ड**

| अ.क्र. | संवर्गाचे नाव व वेतनश्रेणी | प्रतिनियुक्तीवरील यंत्रणेचे नाव | प्रतिनियुक्तीवरील पदाचे नाव | एकूण पदांची संख्या |
|---|---|---|---|---|
| १ | सहाय्यक निबंधक सहकारी संस्था गट-ब<br>एस-१५ (४१८००-१३२३००) | मुंबई जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँक मुंबई | सहाय्यक निबंधक, मुंबई जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँक मुंबई | १ |
| | | झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरण, मुंबई | सहाय्यक निबंधक, झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरण, मुंबई | १ |
| | | झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरण, ठाणे | सहाय्यक निबंधक, झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरण, ठाणे | १ |
| | | झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरण, पुणे व पिंपरी चिंचवड | सहाय्यक निबंधक, झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरण, पुणे व पिंपरी चिंचवड | १ |
| | | पुणे जिल्हा नागरी सह.पतसंस्था फेडरेशन मर्या.पुणे | सहाय्यक निबंधक, पुणे जिल्हा नागरी सह.पतसंस्था फेडरेशन मर्या.पुणे | १ |
| | | राज्य सहकारी निवडणूक प्राधिकरण, पुणे | सहाय्यक सहकारी निवडणूक आयुक्त, राज्य सहकारी निवडणूक प्राधिकरण, पुणे | ३ |
| | | | एकूण | ८ |